कृषि आयुक्तालयांतर्गत तालुका बीज गुणन केंद्रामधील अस्थायी पदे दि.१ मार्च, २०२४ पासून दि.३१ ऑगस्ट, २०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत... (एकूण २४८ पदे)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ताबिके-२०२४/प्र.क्र.३४/१३-अे**
मंत्रालय विस्तार, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :७ मार्च, २०२४

**वाचा :**

१.वित्त विभाग शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/ वित्तीय सुधारणा-१, दि.४ ऑक्टोबर २००४.

२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.ताबिके-२०२३/प्र.क्र.३२/१३ अे, दि.२१/९/२०२३

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आपुक -१, दि.२१.२.२०२४

४. कृषि आयुक्तालयाचे क्र.कृआ-१११९/साप्र/०२६१/२०२४-२५/ प्र.क्र.५/आस्था-५ (निप)/ ५१९५, दिनांक १४/२/२०२४

**प्रस्तावना :-**

कृषि विभागातील सन २०२३-२४ मधील एकूण २४८ अस्थायी पदांना शासन निर्णय ताबीके-२०२३/प्र.क्र.३२/१३-अे, दि.२१ सप्टेंबर, २०२३ अन्वये दि.१ सप्टेंबर, २०२३ पासून दि.२९ फेब्रुवारी, २०२४ या कालावधीपर्यंत चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आलेली होती.

वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१/२/२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांच्या त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना, तसेच या पूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. १ मार्च,२०२४ नंतर मुदतवाढ देण्याचे अधिकार दिलेले आहेत. यास अनुसरुन तालुका बीज गुणन केंद्र येथील २४८ अस्थायी पदांना दि.०१ मार्च, २०२४ पासून दि.३१ ऑगस्ट, २०२४ या कालावधीपर्यंत पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

तालुका बिजगुणन प्रक्षेत्र (२४०१ ०२६१) या योजनेमधील खालील २४८ अस्थायी पदांना, (६ महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त असलेली पदे वगळून), दि.०१ /३/२०२४ पासून दि.३१/८/२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**तालुका बीज गुणन प्रक्षेत्र (२४०१ ०२६१)**

| अ.क्र | पदनाम | स्थायी पदे | अस्थायी पदे | एकूण पदे |
|---|---|---|---|---|
| १ | कृषि अधिकारी (वर्ग-२) | ० | २२ | २२ |
| २ | कृषि पर्यवेक्षक (वर्ग-३) | १२० | ० | १२० |
| ३ | कृषि सहायक (वर्ग-३ ) | ६० | ८२ | १४२ |
| ४ | शिपाई/ रखवालदार | ० | १४२ | १४२ |
| ५ | प्रशिक्षित मजूर वर्ग-४ | ४२१ | ० | ४२१ |
| ६ | टिलर ऑपरेटर (वर्ग-४) | ० | २ | २ |
| | **एकूण** | **६०१** | **२४८** | **८४९** |

२.  याबाबत होणारा खर्च मागणी क्रमांक डी-३, २४०१-पीक संवर्धन, १०३-बीयाणे, १०३ (००) (०१) तालुका बीज गुणन प्रक्षेत्रे (२४०१ ०२६१ ) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामधील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३.  हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग- २)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.०४ ऑक्टोबर, २००४ तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक :पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१ फेबुवारी ,२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार एकूण २४८ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास दिनांक १/३/२०२४ ते दि.३१/८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०७१४४८१५२४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.03.07 15:19:50 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक ( नि व गु), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
४. सर्व विभागीय कृषि सह संचालक.
५. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत,५ वा मजला, मुंबई-३२
९. कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प/ १५ अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती/ कार्यासन-१३ अे.